**सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानातील लहान व मध्यम शहरांच्या पायाभूत सोयी-सुविधांचा विकास कार्यक्रम (UIDSSMT) या उप-अभियानातंर्गत वाशिम (जि.वाशिम) नगरपरिषदेच्या मंजूर पाणीपुरवठा योजनेस पुरक अनुदान वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पूरक- २०१४/प्र.क्र.१०१/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
तारीख: ०५ मार्च, २०१५.

**वाचा -**

1. **शासन निर्णय क्र.एनयुआर- २०१२/ प्र.क्र. १२७/०९/नवि-३३, दि. ३१ ऑगस्ट २००९.**
2. **नगरपरिषद प्रशासन संचालनालयाची पत्र क्रमांक नपप्रसं/UIDSSMT/वाशिम DSR Diff./२०१४/क.१३, दिनांक २९/०३/२०१४.**

**प्रस्तावना -**

केंद्र शासनाने नागरीकरणाचा वाढता वेग व व्याप्ती विचारात घेऊन देशातील शहरांमध्ये पायाभूत सोयी-सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान जाहिर केलेले होते. सदर अभियानाचे उप-अभियान लहान व मध्यम शहरांकरिता पायाभूत सोयीसुविधांचा विकास कार्यक्रम (UIDSSMT) अंतर्गत राज्यातील "वाशिम" या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेकरिता केंद्र शासनाच्या मान्यतेने पाणीपुरवठा योजनेची अंमलबजावणी केली जात आहे. सदरहू अभियानाच्या मार्गदर्शक तत्वानुसार केंद्र शासनाने मंजूर केलेल्या प्रकल्प किंमतीपैकी केंद्र शासन, राज्य शासन व नागरी स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या हिश्श्याचा मंजूर आकृतिबंध पुढीलप्रमाणे आहे :-

| UIDSSMT अंतर्गत मंजूर प्रकल्पाची एकूण किंमत | केंद्र शासनाचा हिस्सा | राज्य शासनाचा हिस्सा | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा |
|---|---|---|---|
| १००% | ८० % | १०% | १०% |

०२. या योजनेतंर्गत केंद्र शासनाचा निधी प्राप्त होण्यासाठी केंद्र शासनासोबत राज्य शासन व संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने सक्तीच्या व वैकल्पीक सुधारणा क्षेत्रात प्रगती करण्याबाबत करारनामा केला आहे. सदरहू अभियानांतर्गत वाशिमनगरपरिषदेसाठी एकूण रु. २९.९७ कोटी किंमतीची पाणीपुरवठा योजना मंजूर झाली होती. त्या अनुषंगाने केंद्र शासन व राज्य शासनामार्फत वाशिमनगरपरिषदेच्या सदर योजनेसाठी अनुक्रमे रुपये २३.९७६० कोटी व रुपये २.९९७० कोटी एवढा निधी वितरीत करण्यात आलेला आहे. संदर्भाधीन शासन निर्णयानुसार लहान व मध्यम शहरांसाठी

पायाभूत सुविधांचा विकास कार्यक्रम (UIDSSMT) या कार्यक्रमांतर्गत मंजूर प्रकल्पांसंदर्भात फक्त दरसूचीतील फरकामुळे प्रकल्पांच्या अंदाजपत्रकीय किंमतीत होणारी वाढ याची ५० टक्के रक्कम पुरक अनुदान स्वरुपात राज्य शासनाकडून संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना उपलब्ध करून देण्यात येते. तथापि देण्यात येणाऱ्या पुरक अनुदान रकमेचे वितरण केंद्र शासनाकडून दुसऱ्या हप्त्याच्या अनुदानाचे वितरण झाल्यानंतर तसेच दुसऱ्या हप्त्याच्या अनुदानाचा संपूर्ण खर्च झाल्यानंतर करण्यात येते. त्यानुसार दरसूचीतील झालेल्या फरकामुळे वाशिम नगरपरिषदेच्या पाणी पुरवठा योजनेची महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अहवालानुसार सुधारित प्रकल्प किंमत(कंटींजन्सी,इन्शुरन्स व WC चार्जेस वगळून) रु.४२.९७९२कोटी झालेली आहे. सबब मंजूर मूळ प्रकल्प किंमत व निविदा स्वीकृत करण्यात आली त्या वर्षीच्या दरसूचीनुसार परिगणना करून येणारी प्रकल्प किंमत यातील फरकाच्या ५० टक्के रक्कम पुरक अनुदान म्हणून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

लहान व मध्यम शहरांच्या पायाभूत सोईसुविधांचा विकास कार्यक्रम या उपभियानांतर्गत वाशिम नगरपरिषदेच्या मंजूर पाणीपुरवठा योजनेस खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे पुरक अनुदान स्वरुपात निधी वितरित करण्यास मंजुरी देण्यात येत आहे. सदर रकमेचे वितरण पूरक अनुदान म्हणून करण्यात येत आहे.

**(रूपये कोटीत)**

| अ. क्र. | नगरपरिषद | प्रकल्प | प्रकल्प सादर केल्याच्या दरसुचीनुसारमजिप्रा अहवालानुसार प्रकल्पाची किंमत(सुधारीत) | निविदा स्वीकृत करण्यात आली त्या वर्षीच्या दरसूचीनुसार प्रकल्प किंमत(कंटींजन्सी,इन्शुरन्स व WC चार्जेस वगळून) | प्रकल्पाची मूळ मंजूर किंमत व निविदा स्वीकृत करण्यात आली त्या वर्षीच्या दरसूचीनुसार प्रकल्प किंमतयातील फरक (स्तंभ५-स्तंभ४) | प्रकल्पाची मूळ मंजूर किंमत व निविदा स्वीकृत करण्यात आली त्या वर्षीच्या दरसूचीनुसार प्रकल्प किंमत यातील फरकाच्या रकमेपैकी ५० टक्के अनुज्ञेय अनुदान | वितरित करावयाचे पुरक अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **१.** | **२.** | **३.** | **४.** | **५.** | **६.** | **७.** | **८.** |
| १ | वाशिम | पाणी पुरवठा योजना | २९.९७०४ | ४२.९७९२ | १३.००८८ | ६.५०४४ | ६.५०४४ |

०२. यासाठी नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी सदर अनुदान रूपये सहा कोटी पन्नास लक्ष चव्वेचाळीस हजार फक्त (रूपये ६,५०,४४,०००/-) इतक्या रक्कमेचा धनादेश मुख्याधिकारी, वाशिम नगरपरिषद, वाशिम, जिल्हा

वाशिम(Chief Officer,Washim Municipal Council,Washim, Dist-Washim) या नावे काढून तो मुख्याधिकारी,वाशिम नगरपरिषद यांच्याकडे सुपूर्द करावा व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

०३. वर नमूद नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने वितरित केलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र विहित कालावधीत सादर करणे संबंधीत नगरपरिषदेवर बंधनकारक राहील. सदर रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र नगरपरिषदेकडून प्राप्त करून घेऊन महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची जबाबदारी नियंत्रण अधिकारी या नात्याने आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, यांची राहिल.

०४. प्रस्तुत योजनेतंर्गत प्रकल्पाची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर या योजनेमधून काय साध्य झाले याबाबतचा अहवाल सदर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने राज्य शासन व केंद्र शासनास सादर करावा.

०५. वाशिम नगरपरिषदेच्या सदर पाणी पूरवठा प्रकल्पाकरीता याव्यतिरीक्त दरसूचीतील फरकाच्या रकमेची मागणी केली जाणार नाही तसेच सदर पाणी पूरवठा प्रकल्प ६ महिन्याच्या आत पूर्ण करणे बंधनकारक राहिल.

०६. वाशिम नगरपरिषदेस देण्यात येणा-या अनुदान रूपये सहा कोटी पन्नास लक्ष चव्वेचाळीस हजार फक्त (रूपये ६,५०,४४,०००/-) इतक्या रक्कमेचा खर्च हा नगर विकास विभाग- मागणी क्रमांक एफ-२, २२१७, नगर विकास, (००) (६७) जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान/ लहान व मध्यम शहरांच्या पायाभूत सुविधांचा विकास कार्यक्रम/ लहान व मध्यम शहरांच्या एकात्मिक विकास कार्यक्रम या योजनांतर्गत प्रकल्पाची कामे पूर्ण करण्यासाठी राज्यातील नगरपरिषदांना अतिरिक्त अनुदाने (२२१७८१४६) ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर), दत्तमत, १९२- नगरपरिषदांना सहाय्य या लेखशिर्षामधून सन २०१४-१५ या आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

०७. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २५/व्यय ३, दिनांक १६/०१/२०१५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१०११३५१७०४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Seema Pradeep Dhamdhere

Digitally signed by Seema Pradeep Dhamdhere
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Seema Pradeep Dhamdhere
Date: 2015.03.10 11:46:50 +05'30'

**(सीमा ढमढेरे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.

३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

४. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे (पू), मुंबई.

५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी,मुंबई.

९. सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई

१०. उप सचिव (नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

११. जिल्हाधिकारी,वाशिम.

१२. मुख्याधिकारी, वाशिम नगरपरिषद,वाशिम, जि.वाशिम.

१३. निवडनस्ती, नवि-३३.